# 2024 E Book 102 भाग ३ एबा कोच दि कंप्लीट ताजमहाल - पुस्तक परिचय.

# गौशाला, नगारखाना, बावडी







कै. ओकांच्या लेखनातून ताजमहालाच्या वास्तूतील काही भागावर भाष्य केले आहे. त्यातील खालील वास्तूंवर विचार मांडले होते.

६.गौशाळा- या वास्तुचे अस्तित्व असे दाखवत नाही का कि गोपालनातून त्या वास्तूशी निगडित लोकांना दुग्धजन्य पदार्थ आणि गोमय वगैरेचा पुरवठा केला जाणे अपेक्षित होते. म्हणून गोशाळा असणे स्वाभाविक होते.

७. नगारखाना - पहाटेच्या वेळी मंगलवाद्ये वाजवून दिनक्रम सुरू करण्याची प्रथा या वास्तूतील नगारखान्यातून पूर्ण केली जात होती. शिवाय महत्त्वाचे

निर्णय, निरोप वगैरे कळवायला तिथून शक्य होते.

८. बावडी - पिण्याच्या व वापरायला पाण्याची सोय ही मानवाची प्राथमिक गरज आहे. त्यामुळे अशा भव्य वास्तूत त्याचे स्थान कुठे होते?

९. श्री दरवाजा - सामान्यतः वास्तूत प्रवेशद्वारावर श्री, ऋद्धिसिद्धींचे मंगल दर्शन घेतले जावे असा संकेत आहे. दक्षिणेकडील दरवाजातून ताजमहाल वास्तूत प्रवेश करण्याचा मुख्य मार्ग आहे. तिथल्या दरवाजाचे नाव जर सिरी, सिरही, सिद्दी असे आजही असेल तर ते श्री या शब्दाचे अपभ्रंश नाव आहे हे मान्य करायला हवे.

एबा कोच दि कंप्लीट ताजमहाल पुस्तकात यावर काय प्रकाश टाकतात?

२८७ पानावर इंडेक्स मधील संदर्भ असा आहे.


136–43, 137
138–40, 139
garden-wall pavilions (Naubat Khana) 105,
140–43, 140–43
gates: of caravanserais 204–7, 204–7; Dakhnay
Darwaza 109, 204, 207, 207; Fatehabadi
Darwaza (east gate) 115, 115; Fatehpuri
Darwaza (west gate) 115, 115; Sirhi/Sidhi ?
Darwaza (south gate) 116, 117, 200, 201; and see
great gate !
Gaushala 120
126–34, 126–35, 159, 224, 226–27,

६. गोशाला असे ग्रंथाच्या शेवटी इंडेक्स पान १२० पहा म्हटले आहे तिथे काय दिसते?

गोशाला ‘इथे असे तिथल्या चित्राखाली लिहिलेले नाही. फतेहपुरी गेटच्या परिसरातील महाल उर्फ बुर्ज हा सफेद घुमट असेल तर उरलेली इमारत गोशाला असे मानावे लागेल. पुर्वेकडील दरवाज्याच्या भागातील ही इमारत २००३ पर्यंत गोशाळा म्हणून नावाने ओळखली जाते असे त्यांनी म्हटले आहे. ह्या इमारतीत किती गाईंचा गोठा असावा? चारापाण्याची सोय कुठे असावी? असे प्रश्न पडू शकतात.



माझ्या मते ती इमारत दूध एकत्रित करून राजवाड्यातील लोकांना वितरण करायची सध्याच्या डेअरीप्रमाणे वापराची वास्तू असावी. फक्त हिंदूच गाईचे दूध पीत असत असेही नाही. म्हणून ताजमहाल हिंदूंची वास्तू असावी असा निश्कर्ष काढणे घाईचे होईल. शहाजहान पुर्व काळापासून ती ज्या कामाला वापरली जात असेल म्हणून ते नाव व काम तसेच राहिले. २००३ नंतर ती काय कामासाठी वापरली जाते ते यात लिहिलेले नाही पण माझ्या वाचनात आले की ती विदेशी पर्यटकांच्या सोईसाठी वापरात आणली जाते.

...

## ७. नगारखाना-



मशिद आवारात असताना, मृत व्यक्तीच्या कबर भेटीसाठी जाताना गांभीर्याने शांतता पाळणे हे ज्यानी त्याची निर्मिती केली त्यांची अपेक्षा असते असे मानले तर नगारखान्यातून वेळी अवेळी काढलेले ध्वनी बंद ठेवणे अपेक्षित होते. पण

आधीच्या इमारती मधील मंगल ध्वनिंवर नियंत्रण आणले गेले तरीही पूर्वीचे संबोधन तसेच प्रचलित राहिले असावे.

८ ... बावली(डी) -

पान १९८वरील नकाशात बावडी दाखवलेली आहे. पण बावली वा बावडीच्या इमारतीचे आतून दर्वशणारे रंगीत चित्र दिसत नाही. मात्र दुसऱ्या ठिकाणच्या १६व्या शतकातील ११ पायऱ्यांची बावडी (ग्यारह सीढी) रंगीत फोटोत दिसते. त्या म्हणतात,

**"The tower to the south of the mosque houses a baoli, or step well, built in red sandstone. Elaborate well constructions with staircases and galleries are a characteristics feature of Indian architecture throughout the centuries, and we're adopted by Muslim builders. The Taj baoli provides water independently of the waterworks outside the complex. It may have some symbolic connotation as a connection to the underworld, or to the mythical figure of Khwaja Khizr who is associated with wells, because according to Muslim lore he was found the water of life and gained immortality.**

**Other features mentioned ... the octagonal chamber, descending three additional levels below ground".**






वरील लेखनातून ताजमहालाच्या इमारत समूहाला एकूण किती मजले असावेत यावर त्यांनी भाष्य करणे अपेक्षित आहे. मुगलांचा पौराणिक ख्वाजा खिज्रशी काय संबंध? इंडियन म्हणजे कोण ते वाचकांनी समजून घ्यावे.

अन्य लोकांनी काढलेले त्या पायविहिरीचे रंगीत फोटो असल्यास कृपया सादर करावेत.

सध्याच्या काळात याच विहिरीला विजेचा पंप लावून पाणी बागेत फिरवून वनसंवर्धन केले जाते. आणि ठराविक वेळी ताज समोरील कारंजी उडवायला वापरले जाते असे मला तिथल्या हार्टिकल्चरच्या विभाग प्रमुखांनी २०१२ मधे भेटलो असता म्हटल्याचे स्मरते.

जेंव्हा विजेचा वापर केला जात नव्हता तेंव्हा बागेत, कारंजी उडवायला पाणीपुरवठा कसा केला जात होता? चर्चा पुढील भागात करता येईल.

# ९. ...श्री दरवाजाबाबत

**This Sirhindi Tomb was built in the memory of another wife of Shah Jahan called Sirhindi begum. Due to this, the gate is known as "Sirhi Darwaza".**

ताजगंजकडून आत यायचा दक्षिणी दरवाजा.



कमानींच्या मध्यातील मोकळ्या जागेचे जवळून दर्शन.



याचे नाव सिरही कसे पडले? सरहिंदची बाई म्हणून सरहिंन्दीची कबर जवळ आहे. त्याचे इंग्रजीतील स्पेलिंग **Sirhi** म्हणून ते सिरही गेट. याच दरवाज्याला **Sidhi** (कि सिद्धी?) दरवाजा असेही म्हणतात. असे वर वाचायला मिळते. त्याचे स्पष्टीकरण मात्र दिलेले नाही.

...

पुढे चालू ...

१०. यमुनेच्या पात्रातून इतक्यावरच्या पातळीवर खेचून पाणी पुरवठा करायची योजना कशी होती?

११. ताजमहाल प्रमाणे इतर कोणाच्या कबरी असलेल्या इमारती यमुनेकाठी आज आहेत का?

१२. त्या कबरींच्या तळघरातील मजल्यात खरी आणि वरच्या मजल्यावर ओघानेच खोटी कबर मिळते का?

१३. फारसी भाषेत कोरून लिहिलेल्या पट्टीवर कारागिरांनी आपली नावे त्यात लिहिली आहेत?

**The beauty of Taj Mahal has inspired Dubai to build a bigger replica of it. खऱ्या ताजमहालापेक्षा जास्त भव्य वास्तूला भेट देऊन दुबईतील मिपारहिवासी आपला अभिप्राय देतील काय?**



एबा कोच




ताजमहाल वास्तूच्या विविध भागांची नावे व महत्व

कै. ओकांच्या लेखनातून ताजमहालाच्या वास्तूतील काही भागावर भाष्य केले नाही. त्यातील खालील वास्तूंवर एबा कोच यांच्या पुस्तकात काय म्हटलेले आहे ते सादर करत आहे.

१०. ताजमहाल प्रमाणे इतर कोणाच्या कबरी असलेल्या इमारती यमुनेकाठी आज आहेत का?

११. त्या कबरींच्या तळघरातील मजल्यात खरी आणि वरच्या मजल्यावर ओघानेच खोटी कबर मिळते का?

...

## १०. ताजमहाल प्रमाणे इतर कोणाच्या कबरी असलेल्या इमारती यमुनेकाठी आज आहेत का?

**या प्रश्नाचे उत्तर आपल्याला पान ३१ वरील खालील चित्र पहायला लागेल.**



36 above Perspective reconstruction of the scheme of riverfront Agra, based on the Jaipur map (17, 37): as there, the gardens north of the fort are shown slightly too far north, so that they get out of step with the gardens on the left bank. Named sites are preserved to a greater or lesser extent. The Jami' Masjid is shown as it appears today, without its east wing, which was taken down after the Uprising of 1858.

37 opposite The riverfront gardens as named on the Jaipur map (with corrected spelling)

ON THE LEFT BANK

1 Bagh-i Shah Nawaz Khan
2 Buland Bagh (High Garden)
3 Bagh-i Nur Afshan (now Ram Bagh)
4 Bagh-i Jahanara (now Zahara, Zehra, or Zahra Bagh)
5 Un-named garden
6 Rauza of Afzal Khan (tomb garden of Afzal Khan; now Chini-ka Rauza)
7 Bagh-i Khwaja (Muhammad) Zakarya (probably Bagh-i Wazir Khan)
8 Bagh-i Sultan Parwiz
9 Maqbara of I'timad-ud-Daula (tomb garden of I'timad-ud-Daula)
10 Bagh-i Musawi Khan Sadr
11 Bagh Padshahi (Imperial Garden)
12 Moti Bagh Padshahi (Imperial Pearl Garden)
13 (Bagh) Padshahi (Imperial Garden)
14 Lal Bagh Padshahi (Red Imperial Garden)
15 Second Chahar Bagh Padshahi (Imperial Chahar Bagh)
16 Chahar Bagh Padshahi (Imperial Chahar Bagh: Babur's first garden at Agra, in Mughal times called Chahar Bagh or Bagh-i Hasht Bihisht)
17 Bagh-i Mahtab Padshahi (Imperial Moonlight Garden; now Mahtab Bagh)

ON THE RIGHT BANK

18 Haveli of Khan-i Dauran
19 Haveli of Agah Khan
20 Rauza of Shah Jahan (tomb garden of Shah Jahan, i.e. TAJ MAHAL)
21 Bagh-i Khan-i 'Alam
22 Haveli of Asalat Khan
23 Haveli of Mahabat Khan
24 Haveli of Hoshdar Khan
25 Haveli of A'zam Khan
26 Haveli of Mughal Khan
27 Haveli of Islam Khan
28 Padshahi Qil'a (Agra fort)
29 Haveli of Dara Shikoh
30 Haveli of Khan-i Jahan Lodi
31 Haveli of Hafiz Khidmatgar (two enclosures)
32 Haveli of Asaf Khan
33 Haveli of 'Alamgir
34 Haveli of 'Alamgir
35 Masjid Mubarak Manzil
36 Haveli of Sasat (Shayista) Khan
37 Haveli of Ja'far Khan
38 Rauza of Sasat Khan (tomb garden of Shayista Khan)
39 Haveli of Wazir Khan
40 Haveli of Muqim Khan
41 Haveli of Khalil Khan
42 Bagh-i Rai Shiv Das
43 Bagh-i Hakim Kazim 'Ali
44 Rauza of Ja'far Khan (tomb garden of Ja'far Khan)
(45 Chhatri (memorial pavilion) of Jaswant Singh – beyond the end of the map)

Listed Gardens and tombs

THE RIVERFRONT GARDEN CITY 31

यमुनेच्या डाव्या तिरावरील बागा ज्यात कबरी आहेत. कंसातील संख्या वरील नकाशाशी संबंधित आहेत.

(३) राम बाग किंवा ए नूर अफसान - इथे कबर नाही. एबा कोच यांनी पान ३७ वर आवर्जून म्हटले आहे की सध्या या बागेला राम बाग असे संबोधतात. पण मी तिला बाग ए नूर अफसान म्हणणार आहे. (नूर अफसान कोणी खान नव्हता. नूरजहाँने लाटलेल्या हवेलीतील ती एक असावी कालौघात तिचा प्रभाव संपल्यावर पुन्हा जनमानसात रामबाग हे नाव रूढ आहे.) आता न दिसणाऱ्या त्या बागेत मेजवानी दिली होती. (इति एबा कोच - पान३७) ( बागेतली हवेलीत किंवा महालात ती असणार)




**(६) चिनी देशाचा - रौझा ए अफ़झल खान - हा एक सरदार होता. त्याचा भाऊ अमानत खान सिराझी याने ताजमहालाच्या वेगवेगळ्या भागात कुराणच्या आयतींच्या सौंदर्यपूर्ण लेखन पट्ट्या पहायला मिळतात. (उजवीकडे) 'नक्ष' लेखन शैलीत आहे तर सही 'सुलूस' नावाच्या लिपीत सादर केली होती) (French word - cartouches - उच्चार कारतूश - सही किंवा नावासाठी दिलेली जागा) डावीकडे या कबरीच्या जीर्ण इमारतीच्या भिंतीवरील लेखन केलेले आढळते.**




**(९) मकबरा ऐतमाद उदौला - ऐतमाउदौला तेहरानी हा जहांगिराचा सासरा. (इराणहून वाळवंटात मुलीला एकटी टाकून निघून गेला पण नंतर ती परत मिळाली. त्याचे नशीब फळफळले. त्याने अकबराच्या काळात सन १६०५ मधे प्रतिष्ठा मिळवली व जहांगिराच्या राजवटीत तो वजीर झाला. काश्मीरच्या**

सहलीत १६२२ साली तो वारला त्या आधी काही दिवस त्याची पत्नी (एबा कोच यांनी ते नाव या पुस्तकात सांगितलेले नाही) - अजमत बेगम - निवर्तली होती. त्यांच्या स्मृती प्रित्यर्थ मुलगी नूरजहाँ, जहांगिराच्या राणीने ही कबर बांधायला घेतली. सन १६२८मधे ती पूर्ण झाली. या 'बेबी ताज' कबरीतून ताजमहालातील मुगल कलापुर्ण बांधकामाची प्रेरणा मिळाली असे मानले जाते. खुद्द नूरजहाँ व जहांगिराची कबर लाहोरला आहे. बाप जहांगिराने राजकुमार खुर्रमला शाहजहान हा खिताब - पदवी सन १६१७ मधे दिली. (इमारत खूप सुंदर पण कबरी त्या मानाने अगदी सामान्य असे जाणवते.) (कंस माझे)









उजव्या काठावरील बागा ज्यात कबरी आहेत.

(२०) रौझा ए शहाजहान - (मुमताझ असे म्हटलेले नाही) उर्फ ताज महाल.

(१८ व १९) ह्या हवेल्या आता कालाच्या ओघात दिसत नाहीत. मात्र जयपुर नकाशात तो दाखवला आहे. एका १८५० सालातील फोटोत त्या कशा अस्तित्वात होत्या ते लक्षात येते.१८६० च्या सुमारास तिथ श्री देवजी ( Shri Daoji Maharaj Mandir) आता तिथे दशेरा (स्मशान) घाट आहे. ताजमहालाच्या नदीपात्रा समोरील'महताब बाग' पासून तिथे नावेतून जाता येते.




(३८) रौझा ए सासत (शायिस्ता) खान - १६६४ ते १६८८ बंगालचा सुभेदार म्हणून तो ढाक्यात राहात होता. आयुष्याच्या शेवटी तो आग्र्यात परतला. तिथे त्याची हवेली (३६) मधे होती. याची कबर (३८) मधे आहे. शिवाजीशी तितकासा यशस्वी लढा दिला नाही. ( fought not very successfully against the Maharatta leader Shivaji) ( त्याच्या मृत्यु नंतर त्याची प्रचंड मालमत्ता सरकार जमा झाली.)

(४४) जफर खानाची कबर - (याने आपल्या पत्नीची कबर निदान आपल्या कबरी शेजारी का बनवली नाही असा प्रश्न पडतो. कारण) याची हवेली (३७) मधे होती, ती १६३७ सप्टेंबर ३ ला बांधून पुर्ण झाली त्या निमित्ताने एका मेजवानीसाठी शाहजहान तिथे आला होता. सन १८२५ पर्यंत कालौघात ती नष्ट झाली. हा जफर खान कोण? शहाजहानचा साडू - मुमताजची बहीण फरझाना बेगमच्या हा नवरा. दुःखात व्याकूळ 'शहाजहान फरझानाकडे इतका यायला लागला कि त्याच्या चर्चा गावभर होऊ लागल्या. असे मनुचीने नमूद केले आहे' असे एबा कोच म्हणतात. तो १६४७ -४८ सालात पंजाबचा सुभेदार झाला. नंतर दिल्ली, मुलतान, बिहारचा सुभेदार झाला. १६५८मधे त्याने शहाजहान विरुद्ध औरंगजेबाची बाजू घेऊन माळव्याचा सुभेदार झाला. त्याच्या नावाची यमुना नदीकाठी आगऱ्यात एकाला एक लगतच्या तीन हवेल्या होत्या. १६७० साली तो दिल्लीत असताना वारला त्यावेळी फरजानाच्या (मावशीच्या) सांत्वनार्थ औरंगजेबाने आपली दोन मुले पाठवली होती.







(४५) जसवंत सिंह राठोड़ची छत्री - जोधपुरच्या राजाची समाधी. ज्याला आपल्या पुढच्या रांगेत उभा असलेले पाहून शिवाजी महाराजांचा पारा चढला

होता तो. तो १६७८मधे वारला. जिथे छत्री आहे तो भाग आता राजवाडा म्हणून ओळखला जातो. बारादरी ( १२ दरवाज्यांची इमारत) फतेपुर-सीक्रीच्या दगडी साखळी व घंट्यांच्या नक्षीदार कमानींची आठवण करून देतात. सीलचंद यानी जयपुर नकाशात ती दाखवली आहे.




११. ताजमहाल शिवाय इतर कबरींच्या तळघरातील मजल्यात खरी आणि वरच्या मजल्यावर ओघानेच खोटी कबर मिळते का?

एबा कोच यांनी दोन कबरीची जोडीचे वर्णन केले आहे. मात्र अशा एक खाली व एक वर दोन दोन कबरी बांधायचे कारण काय असावे? याला कुराणात काही आधार आहे का? किंवा बादशाहनामा किंवा तत्सम ग्रंथात काही स्पष्टीकरण दिले आहे का? यावर लिहित नाहीत. 'खाली जायचा मार्ग मना' केला आहे. (साधारण ८ मीटर खाली उतरायला २४ पायऱ्या आहेत. तळघर साधारण १५ मीटर लांबीचे असावे.)






याचे उत्तर एतमाउदौलाच्या कबरीकडे पाहून हो असे येते. त्या ठिकाणच्या खरी व खोटी कबरीचे फोटो वर दिलेत. त्यात तळघरातील पिवळ्या रंगातील डाव्या बाजूच्या खऱ्या दोन्ही कबरीवर काही चित्रित केलेले नाही. जसे (उजव्या बाजूच्या) ताजमहालातील तळघरातील मुमताजच्या खऱ्या कबरीवर अल्लाहची ९९ नावे वगैरे कोरलेले आहेत.






डाव्या बाजूच्या ताज महालातील शहाजहानच्या वरच्या मजल्यावरील (खोट्या) कबरीवर अफू (भांगे)च्या झाडा, पानांचे चित्रे आहेत. (१६* ३= ४८ * २ =९६ ३ =९९?) उजव्या बाजूच्या चित्रात एतमादउदौलाची कबर ओकीबोकी आहे.






( फिरदौस आशियानी (शहाजहान यांनी निधनोपरांत पदवी) चिरंतन शांतीत राहायला रिझवान कबरीत आहेत. रजब महिन्याच्या २६व्या रात्री १०७६ हिजरीत स्वर्गातील मेजवानी प्रित्यर्थ त्यांनी देह सोडला. असे बाजूकडील भागात कोरले आहे.) (स्वैर अनुवाद)

...

पुढे चालू...

१२. फारसी भाषेत कोरून लिहिलेल्या पट्टीवर कारागिरांनी आपली नावे त्यात लिहिली आहेत?

१३. कारंजी उडवायला पाण्याची काय सोय होती?